“श्री क्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास” आराखडयाकरिता
नवीन लेखाशिर्षास मान्यता देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२२/प्र.क्र.९०/का.१४४४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २४ फेब्रुवारी, २०२३.

वाचा : नियोजन विभाग, शासन निर्णय, क्रमांक: तीक्षेवि-२०२१/प्र.क्र.४५ /का-१४४४.
दिनांक : २८ जून, २०२२.

प्रस्तावना :-

मा.उपमुख्य मंत्री (वित्त व नियोजन) यांच्या सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय भाषणात “खंडेरायाची जेजूरी” म्हणून ओळखल्या जाणाऱ्या श्री क्षेत्र जेजुरी गड (ता.पुरंदर,जि.पुणे) या तीर्थक्षेत्राच्या विकासाकरिता निधी उपलब्ध करुन देण्यात येईल, असे घोषित करण्यात आले होते. त्यानुसार जिल्हाधिकारी पुणे यांचेकडून रु.३४९.४५ कोटी रकमेचा “श्री क्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा” एकुण ३ टप्प्यामध्ये राबविण्याचे नियोजन सादर करण्यात आले. “खंडेरायाची जेजूरी” म्हणून ओळखल्या “श्री क्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा” मधील टप्पा-१ (भाग-१) व (भाग-२) मधील प्रस्तावित रु.१०९.५७९६ कोटीच्या विकास आराखडयास नियोजन विभाग, शासन निर्णय २८ जून,२०२२ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर आराखडया अंतर्गत समाविष्ट मंजूर कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता निधीच्या वितरणासाठी नियोजन विभागामार्फत स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

“खंडेरायाची जेजूरी” म्हणून ओळखल्या जाणाऱ्या “श्री क्षेत्र जेजुरी गड तीर्थक्षेत्र विकास आराखडा” आराखडयातील कामे विहित केलेल्या कालमर्यादेत पूर्ण होण्याकरिता जिल्हाधिकारी पुणे यांची “संनियंत्रण अधिकारी” म्हणून त्यांच्या अधिपत्याखाली राबविण्यासाठी खालीलप्रमाणे **नवीन लेखाशिर्ष** सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

*मागणी क्रमांक ओ-८*
**३४५२, पर्यटन**
०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा
१०१-पर्यटन केंद्रे
(००)( १४)“श्री क्षेत्र जेजुरी गड तिर्थक्षेत्र जि.पुणे - विकास आराखडा”
(३१)- सहायक अनुदाने
कार्यक्रम/ दत्तमत **(३४५२ ३०३९)**

*मागणी क्र. ओ-१०*

**५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च**

०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा

१०१,पर्यटन केंद्रे

(००)(१३) "श्री क्षेत्र जेजुरी गड तिर्थक्षेत्र जि.पुणे - विकास आराखडा"

कार्यक्रम/ दत्तमत **(५४५२ ०१९६)**

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक:विवि/शिकाना/१६६, दि.२३.१२.२०२२ अन्वये व महालेखापाल यांच्याकडील अनौपचारीक संदर्भ क्रमांक: सं.ख.वि./ चा-१/ नियोजन विभाग/यूओआर-१२६/२०२२-२३/६३९, दिनांक २८.११.२०२२ अन्वये व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२३०२२४१२१४३६५५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03,
pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B,
serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2023.02.24 12:19:39 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३) वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
४) जिल्हाधिकारी, पुणे.
५) जिल्हा नियोजन अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७) अपर मुख्य सचिव, नियोजन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
८) नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
९) निवडनस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.

---------------